गडचिरोली जिल्हा कारागृह तातडीने कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने करण्यात येत असलेली कार्यवाही व उपाययोजनांचा आढावा घेण्यासाठी समिती स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१११५/प्र.क्र.११९/तुरुंग-२
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुख्य इमारत, दुसरा मजला, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १६ मे, २०१५

प्रस्तावना

मा. मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल जनहित याचिका क्र. २१/२०१३ ( डॉ शोमा सेन D/O कांती सेन विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) या न्यायालयीन प्रकरणी मा. न्यायालयाने आदेशित केल्याप्रमाणे, गडचिरोली जिल्हा कारागृह तातडीने कार्यान्वित करण्यासंदर्भात संबंधित विभागांमध्ये समन्वय साधण्याकरिता अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १३.४.२०१५ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीच्या कार्यवृत्तामधील गडचिरोली कारागृह कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने शासन करीत असलेली कार्यवाही विचारात घेवून, मा. न्यायालयाने सदर न्यायालयीन प्रकरणी दिनांक २६.६.२०१५ रोजी पर्यंत मुदतवाढ दिलेली आहे. सबब, गडचिरोली जिल्हा कारागृह लवकरात लवकर कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने याबाबतची संपूर्ण कार्यवाही/ उपाययोजनांचा आढावा घेण्यासाठी व येणा-या अडचणींचे निराकरण करण्याच्या दृष्टीने समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

गडचिरोली जिल्हा कारागृह तातडीने कार्यान्वित करण्यासाठी व मा. न्यायालयाच्या आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे :-

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|
| १) | श्री. रणजित कुमार, जिल्हाधिकारी, गडचिरोली. | अध्यक्ष |
| २) | श्री. डी.जी. सोनटक्के, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गडचिरोली | सदस्य |
| ३) | श्री. संदीप भि.पाटील, पोलीस अधीक्षक, गडचिरोली | सदस्य |
| ४) | श्री. देवरावजी एस. आडे, प्रभारी कारागृह अधीक्षक, गडचिरोली | सदस्य |
| ५) | श्री. ज.ल. पावरा, उप सचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |

सदर समितीची कार्यपद्धती खालीलप्रमाणे असेल.

अ) गडचिरोली जिल्हा कारागृह कार्यान्वित करण्यासाठी करण्यात येत असलेल्या बांधकाम व अन्य बाबींचा आढावा घेणे.

आ) गडचिरोली जिल्हा कारागृहाच्या कामांचे सर्वेक्षण करून उद्भवणा-या अडचणींचे/ त्रुटींचे तात्काळ निवारण करण्याच्या दृष्टीने शासनाच्या विविध विभागांमध्ये समन्वय साधणे.

इ) गडचिरोली जिल्हा कारागृहाचे बांधकाम पूर्णत्वास नेण्यासाठी, बांधकामादरम्यान उद्भवणा-या अडचणींचे/ त्रुटींचे तात्काळ निवारण करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करणे.

ई) गडचिरोली जिल्हा कारागृह बांधकामाबाबतचा प्रगती अहवाल दर पंधरा दिवसांनी शासनास सादर करणे.

२. सदर समितीने दिनांक २२ मे, २०१५ रोजी सकाळी ११.०० वाजता गडचिरोली जिल्हा कारागृहास प्रत्यक्ष भेट देवून गडचिरोली जिल्हा कारागृह तातडीने कार्यान्वित होईल, या दृष्टीने जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी समितीचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४०४१७५७०८४२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.16 16:14:24 +05'30'

(ज.ल.पावरा)
शासनाचे उप सचिव

प्रत,

- प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
- जिल्हाधिकारी, गडचिरोली,
- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
- विशेष पोलीस महानिरीक्षक व कारागृह उपमहानिरीक्षक, (दक्षिण विभाग)/मुंबई,
- कारागृह उपमहानिरीक्षक, (पूर्व विभाग)/ नागपूर,
- कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गडचिरोली,
- पोलीस अधीक्षक, गडचिरोली,
- प्रभारी कारागृह अधीक्षक, गडचिरोली,
- उप सचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवड नस्ती (तुरुंग-२)